**विविध बँकामार्फत कर संकलन केलेल्या रकमेचा भरणा रिझर्व्ह बँकेकडे करताना नजरचुकीने झालेल्या अतिरिक्त रकमांच्या वा दुबार भरणा रकमांच्या परताव्याबाबतची कार्यपध्दती निश्चित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक - संकीर्ण १०.१३/प्र.क्र.१३३/अर्थोपाय**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २९ मार्च, २०२२.

**पहा**- शासन परिपत्रक क्रमांक-संकीर्ण १०.१३/प्र.क्र.१३३/अर्थोपाय, दि.०४.०३.२०१५.

**प्रस्तावना**-

दिनांक ०१.०७.२०१७ पासून वस्तू व सेवा कर अधिनियम, २०१७ अस्तित्वात आला आहे. विविध बँकामार्फत अशा करांचे संकलन केले जाते व अशा कर संकलन केलेल्या रकमेचा भरणा भारतीय रिझर्व्ह बँकेकडे केला जातो. असा संकलित करांचा भरणा करताना नजरचुकीने झालेल्या अतिरिक्त रकमांच्या वा दुबार भरणा झालेल्या रकमेचा परतावा करण्याविषयी मा.अपर मुख्य सचिव (लेखा व कोषागारे) यांचे अध्यक्षतेखाली दि १५.०२.२०२२ रोजी बैठक आयोजित करण्यात आली होती. सदरहू बैठकीत अशा अतिरिक्त/दुबार भरणा झालेल्या रकमेचा परतावा करण्याबाबत वित्त विभागाच्या दि.०४.०३.२०१५ च्या परिपत्रकामध्ये केवळ राष्ट्रीयकृत बँक असा उल्लेख आहे, त्याऐवजी प्राधिकृत बँका असा उल्लेख असणे आवश्यक असून त्याअनुषंगाने सदरहू शासन परिपत्रकात सुधारणा करणे आवश्यक असल्याचे ठरले. त्यानुसार खालीलप्रमाणे सुधारित शासन परिपत्रक निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन परिपत्रक**-

वस्तू व सेवा कर विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येणा-या कायद्यांतर्गत करांचे संकलन राज्य शासनाने व केंद्र शासनाने प्राधिकृत केलेल्या विविध बँकामार्फत केले जाते. संकलित करांचा भरणा भारतीय रिझर्व्ह बँकेकडे करत असताना नजरचुकीने काही वेळा अशा प्राधिकृत बँकामार्फत अतिरिक्त रकमांचे प्रदान भारतीय रिझर्व्ह बँकेकडे होते. अशा रकमा परत करण्यासाठीचे प्रस्ताव प्राधिकृत बँकांकडून वस्तू व सेवा कर आयुक्त कार्यालयाकडे प्राप्त होतात.

२. करापोटी जमा झालेल्या रक्कमेपेक्षा भारतीय रिझर्व्ह बँकेकडे जास्त रक्कम हस्तांतरीत झाली असेल तर ती परत करण्याचा विषय हा जमा कर व हस्तांतरीत रक्कम यांच्या मेळजुळणीशी संबंधित आहे. अशा अतिरिक्त रक्कमांच्या परताव्याबाबतची कार्यपध्दती पुढीलप्रमाणे निश्चित करण्यात येत आहे.

अ) अधिदान व लेखा अधिकारी कार्यालयाने बँकांनी अतिरिक्त रकमांच्या परताव्याबाबत केलेल्या दाव्याच्या अनुषंगाने राज्य कर आयुक्त, महाराष्ट्र राज्य यांचेकडून अभिप्राय घ्यावेत.

ब) राज्यकर आयुक्त यांनी अतिरिक्त रकमा प्रदान झाल्या आहेत किंवा कसे या विषयीचे बँक स्क्रोल व विवरण तपासून अधिदान व लेखा अधिकारी कार्यालयास त्यावर अभिप्राय द्यावेत.

क) राज्यकर आयुक्त यांनी असे अभिप्राय देत असतांना वस्तू व सेवा कर विभागाने कोणती तपासणी सूची (checklist)अवलंबावी या विषयाच्या सूचना अंतर्गत परिपत्रकान्वये संबंधितांना द्याव्यात.

ड) राज्य कर आयुक्त यांनी दिलेल्या अभिप्रायांच्या आधारे अधिदान व लेखा अधिकारी कार्यालयाने बँकांनी अतिरिक्त रक्कम अदा केली असेल तर त्यांना ती परत करावी.

३. एकावेळी रु.१.०० कोटी पर्यंत अतिरिक्त रक्कम अदा करणेबाबत राज्य कर आयुक्त व अधिदान व लेखा कार्यालयाने वरील प्रमाणे कार्यवाही करावी. असे प्रस्ताव यापुढे शासनाकडे मान्यतेसाठी पाठविण्यात येऊ नयेत.

४. अतिरिक्त रक्कम रु.१.०० कोटी पेक्षा अधिक असल्यास, प्रथम अधिदान व लेखा अधिकारी कार्यालयाने राज्य कर आयुक्त यांचे अभिप्राय घ्यावेत व त्यांनी अतिरिक्त रक्कम प्रदान करण्यास सहमती दर्शविल्यानंतर अधिदान व लेखा कार्यालयाने तसे शासनास कळवावे व शासन मान्यतेनंतर योग्य ते आदेश अधिदान व लेखा कार्यालयाने निर्गमित करावेत.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०३२९१२४३५४५७०५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

JAYANT B KULKARNI

Digitally signed by JAYANT B KULKARNI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=21c6e2b773a3859ca97c27d5f4e1521c3f812fcd1a7cbeac6f9da1018849c0a7, pseudonym=2ABC09B5C14FF1EEB51B4984AC3174CE5CE3A8B4, serialNumber=9DEF0B6A8723E2ED0B4674C8E4A796EF130132F3686DE1AE9848AAD4DE2445E0, cn=JAYANT B KULKARNI
Date: 2022.03.29 12:48:09 +05'30'

**( ज. बा. कुलकर्णी )**
उप सचिव, वित्त विभाग

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव(वित्त) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
२. प्रधान सचिव (वि.सु.) यांचे स्वीय सहायक
३. प्रधान सचिव (ले.व को.) यांचे स्वीय सहायक
४. प्रधान सचिव (व्यय) यांचे स्वीय सहायक
५. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई

६. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई
७. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
८. महालेखापाल-२ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, नागपूर
९. राज्य कर आयुक्त, वस्तू व सेवा कर विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१०.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
११.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१२.उप सचिव (कोषा-प्रशा.५), वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई
१३.उप सचिव (कराधान), वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई
१४.उप सचिव (विनियम), वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई
१५.निवड नस्ती.